**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) नागनाथ दौलतराव देशमुख, सहशिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२५/प्र.क्र.१४/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २२ मे, २०२५

**<u>संदर्भ</u> :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९,दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६,दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नांदेड यांचे पत्र क्र.जिपना/शिअप्रा/प्रा-१३अ/१८८९/२०२४/शिक्षण विभाग (प्रा.)/ जि.प.नांदेड, दि.२७/०२/२०२४
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/संकीर्ण/६०७९/२०२४, दिनांक १२/०९/२०२४

**<u>ज्ञापन</u> :-**

कै. (श्री.) नागनाथ दौलतराव देशमुख, सहशिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा गोलेगाववाडी,केंद्र गोलेगाव,ता.लोहा,जि.नांदेड यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०४/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) देशमुख, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. नांदेड यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. कै. (श्री.) देशमुख यांच्या पत्नी श्रीमती अनिता नागनाथ देशमुख यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दिनांक २८/०६/२०२१ रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे. सबब, कै. (श्री.) देशमुख यांच्या वारसास वित्त विभागाच्या दि.२९/०५/२०२० च्या शासन निर्णयान्वये रु. ५० लक्ष रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात कवच मिळावे असा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांनी सादर केला आहे.

४. कै. (श्री.) नागनाथ दौलतराव देशमुख, सहशिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा गोलेगाववाडी,केंद्र गोलेगाव,ता.लोहा,जि.नांदेड येथे दिनांक २९/०५/२०१८ पासून कार्यरत होते.

५. तहसिल कार्यालय लोहा यांचे आदेश दिनांक २२/०३/२०२१ अन्वये कै. (श्री.) देशमुख यांची दिनांक २२/०३/२०२१ पासून कोरोना कोव्हिड १९ संसर्ग विषाणूचा प्रादुर्भाव रोखणे कामी उपाययोजना करणेकामी मतदान केंद्रस्तरीय कोविड अधिकारी म्हणून गोलेगाववाडी प्रभाग क्र.३ येथे नियुक्ती करण्यात आली होती.

६. कै.(श्री.) देशमुख यांची दि.२८/०३/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे दिसून येते.

७. कै.(श्री.) देशमुख यांची तहसिल कार्यालय लोहा यांचे कार्यालयीन आदेश क्रमांक.२०२०/COVID-१९/Containment Zone/कावी दिनांक २२/०३/२०२१ अन्वये दिनांक २२/०३/२०२१ पासून कोरोना कोव्हिड १९ संसर्ग विषाणूचा प्रादुर्भाव रोखणे कामी उपाययोजना करणेकामी मतदान केंद्रस्तरीय कोविड अधिकारी म्हणून गोलेगाववाडी प्रभाग क्र.३ येथे नियुक्ती करण्यात आली होती.सदरचे कर्तव्य बजावत असताना दिनांक ०४/०५/२०२१ रोजी कोरोना आजारामुळे मृत्यू झाला आहे. त्यानुसार कै.(श्री.) देशमुख हे इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर असल्याबाबत तहसीलदार,लोहा यांनी प्रमाणित केले आहे.

८. (श्री.) देशमुख यांचेवर दिनांक २९/०३/२०२१ ते दिनांक ०१/०४/२०२१ या कालावधीत डेल्टा मल्टीस्पेशालिटी हॉस्पीटल, नांदेड येथे कोव्हिड-१९ उपचार करण्यात आले. नंतर दिनांक ०१/०४/२०२१ ते दिनांक २८/०४/२०२१ या कालावधीत ग्लेनईगल्स ग्लोबल हॉस्पिटल्स,हैदराबाद येथे कोव्हिड-१९ उपचार करण्यात आले. आणि दिनांक २९/०४/२०२१ ते दिनांक ०४/०५/२०२१ या कालावधीत निरामय सुपरस्पेशालिटी हॉस्पिटल्स,नांदेड येथे कोव्हिड-१९ उपचार करण्यात आले. दिनांक ०४/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ आजाराने मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे MBBS, निरामय सुपरस्पेशालिटी हॉस्पिटल्स,नांदेड यांनी प्रमाणित केले आहे.

९. कै.(श्री.) देशमुख यांचा दिनांक ०४/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र उपनिबंधक (जन्म व मृत्यु), महानगरपालिका, नांदेड वाघाळा यांचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

१०. मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर,कंधार यांनी कै. (श्री.)देशमुख यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) अनिता नागनाथ देशमुख (२) गितांजली नागनाथ देशमुख (३) ऋतुजा नागनाथ देशमुख यांना घोषित केले आहे.

११. कै. (श्री.) नागनाथ दौलतराव देशमुख, सहशिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा गोलेगाववाडी,केंद्र गोलेगाव,ता.लोहा,जि.नांदेड यांना २२०२ ०१७३-३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रमाणित केले आहे.

१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड व MBBS, निरामय सुपरस्पेशालिटी हॉस्पिटल्स,नांदेड यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर,कंधार कै. (श्री.) देशमुख यांचे कायदेशीर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) अनिता नागनाथ देशमुख (२) गितांजली नागनाथ देशमुख (३) ऋतुजा नागनाथ देशमुख यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र.५८६/व्यय-५, दिनांक २५/०४/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्ष प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०५२२१८३७१२६२२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APPASING
RAMSING RAJPUT

Digitally signed by APPASING RAMSING RAJPUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education and Sports, 2.5.4.20=81C03748EA91B5CA6EB76216FADD8CFC070967B2826BADC6BA66DC8151A5B97A, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02486C751E1117F7DF4BDEA131CC54D2A4486AA35E5AB82CE788466F2EC90916, cn=APPASING RAMSING RAJPUT
Date: 2025.05.22 18:38:03 +05'30'

**( आ. रा. राजपूत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), नांदेड

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई

२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

३. श्रीमती अनिता नागनाथ देशमुख, ता. लोहा जि. नांदेड पीन-४३१७१४

४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.१४/२०२५) ( Computer No. १०७९०६५ )